आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मूल्यमापन, संनियंत्रण व उपयोगिता तपासण्याकरीता निधी राखीव ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः टिएसपी-२०१८/प्र.क्र.१७० /का.६

मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२

तारीख: :- **१७ डिसेंबर,२०१८.**

**वाचा**

१ .आ.वि, शासन निर्णय क्र.आउयो-१०९१/प्र.क्र.११ /का.६, दि.२१/०९/१९९२
२. आ.वि, शासन निर्णय क्र.टिएसपी-२००८/प्र.क्र.६ /का.६, दि.१६/१२/२००९
३. आ.वि, शासन निर्णय क्र.टिएसपी-२०१३/प्र.क्र.२४७ /का.६, दि.२०/०६/२०१४
४.नि.वि, शासन निर्णय क्र.डिएपी १०१४/प्र.क्र.१९८/का-१४८१, दि.२७/०८/२०१४
५. आ.वि, शासन निर्णय क्र.टिएसपी-२०१८/प्र.क्र.२१७ /का.६, दि.१६/१०/२०१७
६. आ.वि, शासन निर्णय क्र.टिएसपी-२०१८/प्र.क्र.१५० /का.६, दि.३१/१०/२०१८

**प्रस्तावना -**

आदिवासी विकास विभागामार्फत नियोजन करण्यात येत असलेल्या आदिवासी घटक कार्यक्रमाचा वार्षिक नियतव्यय जिल्हा उपयोजना व राज्य उपयोजनांकरीता मंजुर करुन वितरीत करण्यात येतो. आदिवासी उपयोजनेच्या व्याप्ती व आकारमानात दिवसोंदिवस मोठया प्रमाणात वाढ होत असून त्याचे वार्षिक नियोजन करण्यासाठी अद्ययावत माहिती संकलन (Database) करणे, आराखडे तयार करणे इ. अनुषंगिक बाबींची आवश्यकता आहे. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध होत असलेल्या निधीचा वापर आदिवासी उपयोजनेच्या उद्दीष्टांनुसार आदिवासी लाभार्थ्यांकरीता त्यांची सामाजिक व आर्थिक गती वाढविण्यासाठी तसेच सर्वसाधारण क्षेत्र व आदिवासी क्षेत्र यामधील विकासाची दरी कमी करण्यासाठी होत असल्याबाबतची उपयोगिता तपासण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांचे मूल्यमापन व योग्य सनियंत्रण केले जाणे आवश्यक आहे. याशिवाय आदिवासी विकासाच्या दृष्टीने राबविण्यात येणाऱ्या योजनांची उपयुक्तता वाढविण्यासाठी धोरणामध्ये कालानुरुप सुधारणा करण्याची आवश्यकता असते. नियोजन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २७/०८/२०१४ च्या शासन निर्णयान्वये सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत जिल्ह्याच्या एकूण मंजुर नियतव्ययाचा कमाल ०.५ % नियतव्यय मूल्यमापन, संनियंत्रण व डाटा एन्ट्री, इ.साठी खर्च करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. याच धर्तीवर आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत एकूण नियतव्ययाच्या कमाल ०.५ टक्के इतका निधी मूल्यमापन, संनियंत्रण व

उपयोगिता तपासण्याकरीता राखीव ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

१. आदिवासी घटक कार्याक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या राज्य वार्षिक उपयोजना व जिल्हा वार्षिक उपयोजना अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांचे मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासण्यासाठी आदिवासी घटक कार्यक्रमाच्या एकूण वार्षिक नियतव्ययाच्या कमाल ०.५ टक्के एवढा नियतव्यय राखीव ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. आदिवासी घटक कार्यक्रमाच्या राज्यस्तर नियतव्ययाच्या ०.५ टक्के निधी राज्यस्तरावरील योजनेच्या मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासण्यासाठी व जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमाच्या नियतव्ययाच्या ०.५ **टक्के** निधी जिल्हा योजनेच्या मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासण्यासाठी वापरण्यात यावा.

३. मूल्यमापन व संनियंत्रण निधीमधून खालील बाबींसाठी खर्च करता येईल.

(१) माहिती विश्लेषण (Data Analysis):- (१)विविध माहितींची नोंदणी करणे, व्हिजन डॉक्युमेंट तयार करणे, योजनांचा अहवाल तयार करणे, (२) योजनांचे मूल्यमापन करणे यासाठी खाजगी तज्ञ/बाह्यसंस्थांच्या सेवा घेणे, (३)योजनांच्या मुल्यमापनासाठी सामाजिक अंकेक्षण (Social audit) करणे.

(२) योजना आराखडे तयार करणे :- विभागांतर्गतची विविध बांधकामासाठी खाजगी आर्किटेक्चर/ तज्ञ सेवा उपलब्ध करुन आराखडे (टाईप प्लॅन) , DPR तयार करणे, तसेच पर्यटनाच्या दृष्टीने आदिवासी क्षेत्रामध्ये Eco tourism आराखडे तयार करुन घेणे. आदिवासी समाजाच्या उत्पन्न वाढीच्या दृष्टीने बाजारपेठ उपलब्ध करुन देणे तसेच त्यांचे हस्तकला विकास, संस्कृती संवर्धन, लोककला संवर्धन इ.च्या दृष्टीने आराखडा तयार करणे.

(३) ई- गव्हर्नन्स :- कार्यालयीन कामकाजासाठी संगणकीय प्रणाली (Software ) विकसित करणे , संकेतस्थळ ( website) , पोर्टल विकसित करणे, संनियंत्रणासाठी online MIS/Report ची निर्मिती करणे इ.

(४) माहिती प्रसिद्धी:-विभागामार्फत राविण्यात येणाऱ्या विविध योजनांच्या माहितीसाठी माहिती व्यवस्थापन प्रणाली (MIS) निर्माण करणे, विविध योजनांचे Documentation करणे, माहिती पत्रके, यशोगाथा, माहितीपट इ.तयार करणे, व मिडीया प्लॅन तयार करणे.

(५) <u>प्रशिक्षण:-</u> आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना व इतर विकासात्मक कार्यक्रमांची फलनिष्पत्ती वाढविण्याच्या दृष्टीने संबंधित अधिकारी, कर्मचारी तसेच आदिवासी लाभार्थी यांचे प्रशिक्षण व क्षमतावृध्दी करणे तसेच आदिवासी उपयोजना नियोजन व मुल्यमापन करण्याकरीता राज्य / क्षेत्रीय स्तरावर विशेष कक्ष / सेंटर स्थापन करणे.

(६) <u>लेखापरीक्षण:-</u>आदिवासी उपयोजनेंतर्गत मोठ्या प्रमाणात निधी खर्च करण्यात येत असल्याने सदर खर्चाची उपयोगिता वाढविण्याच्या दृष्टीने वित्तीय सल्ला तसेच लेखापरीक्षणाची आवश्यकता असते.त्यानुसार विभागाच्या अधिनस्त सार्वजनिक संस्थांचे लेखे परिक्षण/लेखे तयार करुन घेणे.तसेच खाजगी चार्टड अकॉटंट (C.A.) / वित्तीय सल्लागार यांच्या सेवा आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन घेणे.तसेच सामाजिक अंकेक्षण ( Social Audit ) व्यवस्थापन उभे करणे.

(७) <u>अभ्यास दौरा:-</u> आदिवासींचे जीवनमान व आर्थिक स्तर उंचावण्याच्या दृष्टीने नाविण्यपूर्ण उपक्रम राबविण्याकरीता राज्यातील तसेच राज्याबाहेरील विशेष/ मॉडेल उपक्रमाचा अभ्यासदौरा आयोजित करणे.

(८) <u>तज्ञ निवड:-</u>आदिवासी घटक कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी कंत्राटी तत्वावर अभियंते, आर्किटेक्ट, आय टी तज्ञ , सामाजिक विश्लेषक (Social Analyst), लेखापाल अशा विषयतज्ञांच्या ( Subject Specialist ) / सल्लागार (Consultants) यांच्या सेवा उपलब्ध करुन घेणे. तसेच तज्ञ व्यक्ती/ संस्था यांचे सोबत करारनामा (MoU) करुन आवश्यकतेनुसार सेवा उपलब्ध करुन घेणे.

५. सदर योजनेतंर्गत राज्य वार्षिक आदिवासी उपयोजनेसाठी उपसचिव ( अर्थसंकल्प ), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय हे नियंत्रक अधिकारी असतील, सदरचा निधी आवश्यकतेनुसार आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारीतील क्षेत्रीय कार्यालयांना देय राहील. तसेच जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेसाठी जिल्हाधिकारी हे नियंत्रण अधिकारी राहतील व संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास हे समन्वय अधिकारी राहतील व संबंधित प्रकल्प अधिकारी/ सहायक प्रकल्प अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी असतील.

६. प्रस्तुत योजनेच्या प्रशासकिय मान्यता व योजनेतील निधीच्या पुनर्विनियोजनाबाबत प्रचलित पद्धतीने कार्यवाही करण्यात यावी. प्रकरणी राज्य स्तरीय योजनांचे मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासण्यासाठीचा खर्च राज्य वार्षिक योजनेतंर्गत **मागणी क्र.टी५** खाली तसेच जिल्हास्तरीय योजनांचे मुल्यमापन, संनियंत्रण व उपयुक्तता तपासण्यासाठीचा खर्च जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेंतर्गत **मागणी क्र.टी-९** खाली

भागविण्यात यावा. याबाबतच्या राज्यस्तरीय लेखाशीर्ष/जिल्हास्तरीय योजना उपशीर्ष सांकेतांक बाबत स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१५१२१४३३११२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.12.17 16:57:45 +05'30'

**(सु. ना. शिंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई,
२) मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई,
३) मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
४) मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
५) मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७) सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन विभाग,
८) प्रधान सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय,मुंबई,
९) सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अपर आयुक्त व सदस्य सचिव,विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी-२३/ए,साउथ अंबाझरी मार्ग,अंध विद्यालयाजवळ,नागपूर,
११) सदस्य सचिव,मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊड, तळमजला,औरंगाबाद-४३१००१,
१२) सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैद्यानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १८,वा मजला, (पश्चिम बाजू) मंत्रालयासमोर,मुंबई-३२,
१३) कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १९ वा मजला, (पश्चिम बाजू), मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,

१५) सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समित्या,
१६) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक,
१७) आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे,
१८) सर्व अपर आयुक्त,आदिवासी विकास,
१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,नाशिक,
२०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,
२१) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२२) सर्व विशेष कार्यकारी अधिकारी, विभागीय आयुक्तांची कार्यालये,
२३) सर्व जिल्हाधिकारी कार्यालये,
२४) सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,
२५) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
२६) मा.प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,.
२७) आदिवासी विकास विभागातील सर्व सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, आ.वि.वि, मंत्रालय,मुंबई,
२८) संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई,
२९) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.